**जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान अभियानांतर्गत एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम या उप अभियानातील मंजूर प्रकल्प पुर्ण करण्याकरिता घरकुल घटकाकरिता अतिरिक्त अनुदान अनुज्ञेय होण्याकरिता अंतिम केंद्र हिस्सा वितरीत करुन होण्याच्या मुदतीत वाढ करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जनेयो.१२.१२/२०१३/प्र.क्र.१४५/गृनिधो-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक. १३ एप्रिल, २०१५.

वाचा —

**१) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांकः जनेये-२००६/प्र.क्र.४६/गृनिधो-२, दिनांक-२५ जुन,२००७.**

**२) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांकः जनेयो-२००८/प्र.क्र.१८८/गृनिधो-२, दिनांक.३ फेब्रुवारी,२००९.**

**३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीएस-११०७/अनौ.३६/प्र.क्र.१३५/०८/नवि-९, दिनांक.२४ डिसेंबर,२००८**

**४) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्र.नांनिफ.२००८/प्र.क्र.२३/गृनिधो-२, दि.३१ मे,२०१०.**

**५) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्र.जनेयो.१२.१२/प्र.क्र.१४७/गृनिधो-२,दि.२८.०१.२०१४.**

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान अभियानाअंतर्गत राज्यातील छोटया व मध्यम शहरातील नागरी स्वराज्य संस्थांमध्ये एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम या उपअभियानाची अंमलबजावणी संदर्भांकित शासन निर्णय क्रमांक १ नुसार करण्यात येत आहे. केंद्र शासनाव्दारे या कार्यक्रमाअंतर्गत राज्यातील एकूण ९३ नागरी स्वराज्य संस्थांचे १२७ प्रकल्प मान्य केले आहेत, ज्यात १२ महानगरपालिका व ८१ नगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदा यांचा समावेश आहे. नागरी स्वराज्य संस्थामधील झोपडपट्टयांचा एकसंघ पध्दतीने विकास करणे, त्यांना पर्याप्त निवारा व मुलभूत सोईसुविधा उपलब्ध करुन देऊन झोपडपट्टीवासियांचे राहणीमान सुधारणे व त्यांचे जीवनमान सुखावह करुन सभोवतालची परिस्थिती सुधारणे हे या कार्यक्रमाचे उद्दिष्ट आहे.

२. या उपअभियानांतर्गत केंद्र शासनाव्दारे मंजूर प्रकल्पातील घरकुल घटकांच्या किंमतीत झालेली वाढ लक्षात घेऊन प्रकल्प पूर्ण करण्याकरिता राज्य शासनाव्दारे अतिरिक्त अनुदान संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक ५ अन्वये काही अटी व शर्तीनुसार अनुज्ञेय ठरविण्यात आले आहे. यातील अट क्र.१२ नुसार ज्या नागरी संस्था दि.३० सप्टेंबर,२०१४ पर्यंत केंद्र शासनाकडून मंजूर प्रकल्पाचा दुसरा व अंतिम हप्ता प्राप्त करुन घेऊ शकतील अशाच प्रकल्पांना अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे. तसेच अट क्र.१४ नुसार प्रकल्पनिहाय अतिरिक्त अनुदानाची अनुज्ञेयता ठरवून एकूण रुपये २५० कोटीपर्यंतचे प्रस्ताव सुकाणु अभिकरणाव्दारे मंजूर करण्यासही मान्यता देण्यात आली आहे.

३. अतिरिक्त अनुदानाचा लाभ घेऊन प्रकल्प पूर्ण करण्याकरिता नागरी स्वराज्य संस्थाकडून सकारात्मक प्रतिसाद प्राप्त झाला आहे. सुकाणू अभिकरणाव्दारेही अनुज्ञेय अतिरिक्त अनुदानाचे प्रदान केलेले आहे. परंतु यासंदर्भात घेतलेल्या आढाव्याअंती अधिकचा निधी लागण्याची आवश्यकता निदर्शनास आली आहे. हे पाहता केंद्र शासनाकडून मंजूर प्रकल्पाकरिता अनुज्ञेय अतिरिक्त अनुदान देय ठरण्याकरिता केंद्र शासनाकडून दुसरा व अंतिम हप्ता प्राप्त करुन घेण्याची मुदत वाढविणे व यासाठी लागणारा वाढीव निधी महाराष्ट्र निवारा निधी मधून देण्याकरिता मान्यता देण्याबाबत शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रमांतर्गत अतिरिक्त अनुदान अनुज्ञेय ठरण्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णय क्र.५ मधील अट क्र.१२ मध्ये नमूद इतर अटी व शर्तीच्या अधीन राहून, ज्या नागरी स्वराज्य संस्थांनी केंद्र शासनाकडून मंजूर प्रकल्पाकरिता दुसरा व अंतिम केंद्र हिस्सा दि.३१ मार्च,२०१५ पूर्वी अथवा केंद्र शासन जोपर्यंत असा हप्ता वितरीत करेल तोपर्यंत प्राप्त करुन घेतला असेल, तर अशा नागरी स्वराज्य संस्थांचे अतिरिक्त अनुदानाचे प्रस्ताव अनुज्ञेय ठरविण्यास मान्यता देण्यात येत आहेत.

२. "विभागीय आयुक्त समिती" ने शिफारशीत केलेल्या प्रस्तावाची छाननी करुन एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रमकरिता म्हाडातील मुख्य अभियंता तथा राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, प्रकल्पनिहाय यथास्थिती,दि.२२ जानेवारी,२०१५ रोजी घेण्यात आलेल्या आढाव्याचा विचार करुन अतिरिक्त अनुदानाची अनुज्ञेयता निश्चित करेल व त्यास उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांची मान्यता घेईल. याकरिता यापूर्वी उपलब्ध

केलेल्या निधी व्यतिरिक्त, रु.२०० कोटी इतक्या मर्यादेपर्यंतचा निधी महाराष्ट्र निवारा निधी मधून उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. अतिरिक्त अनुदानाबाबत शासन निर्णय क्र.५ मधील इतर अटी व शर्ती यथास्थिती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१३१६१७१०६४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Bhaskar Pawar

Digitally signed by Govind Bhaskar Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Govind Bhaskar Pawar
Date: 2015.04.13 16:27:43 +05'30'

**( गोविंद पवार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री(गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई-३२.
६. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
७. सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी.
८. मुख्य अभियंता-१, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जूएनएनयुआरएम कक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
९. प्रधान महालेखापाल, महाराष्ट-१,(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा,मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता लेखापरीक्षा)/नागपूर.
११.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई.

१२.उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग, नवी मुंबई.

१३.संबंधित कोषागार अधिकारी, (शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रानुसार)

१४.वित्त नियंत्रक,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई.

१५.अधिदान व लेखाअधिकारी,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.

१६.निवासी लेखा अधिकारी,मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ,गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

१७.मुख्य अधिकारी,पुणे/नागपूर/अमरावती/नाशिक/कोकण गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.

१८. प्रधान सचिव,वित्त विभाग तसेच वित्त विभागांतर्गत (व्यय-३,अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन),मंत्रालय,मुंबई.

१९.प्रधान सचिव,नियोजन विभाग(का.१४६१),मंत्रालय,मुंबई-३२.

२०.प्रधान सचिव,सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

२१.प्रधान सचिव,नियोजन विभाग (का.१४६१),मंत्रालय,मुंबई-३२.

२२.प्रधान सचिव,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

२३.सचिव,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

२४.सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई.

२५.उप संचालक(एम भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शं्हरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग (संनियत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)

२६.सह संचालक,लेखा व कोषागरे कॉम्पयुटर सेल, नवीन प्रशासन भवन,५वा मजला, मंत्रालयासमोर मुंबई.

२७.उप सचिव/सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी,गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

२८.संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी,महानगरपालिका/नगरपालिका.

२९.निवडनस्ती (गृनिधो-२)सेल कार्यासन,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.